**डॉ. सचिन दिलीप बारी, तत्कालीन उप-विभागीय पोलीस अधिकारी, दौंड उप-विभाग, पुणे ग्रामीण यांच्या विभागीय चौकशी प्रकरणी "सादरकर्ता अधिकारी" यांची नियुक्ती करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांकः इएनक्यु-२०२०/प्र.क्र.७३/पोल-२**

दुसरा मजला, मंत्रालय (मुख्य इमारत),
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
तारीख: १० जून, २०२४

वाचा :

१) **शासन ज्ञापन, गृह विभाग, क्रमांकः** इएनक्यु-२०२०/प्र.क्र.७३/पोल-२, दिनांक २३/११/२०२०.
२) **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** संकिर्ण-१९९५/प्र.क्र.२/९५/१०-अ, दिनांक १८/०५/१९९६.

**शासन आदेश :**

ज्याअर्थी, डॉ. सचिन दिलीप बारी, तत्कालीन उप-विभागीय पोलीस अधिकारी, दौंड उप-विभाग, पुणे ग्रामीण हे शिस्तभंगविषयक प्रकरणामध्ये संबंधीत असून, त्यांच्याविरुद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ८ मध्ये घालुन दिलेल्या पध्दतीनुसार विभागीय चौकशी करण्यात येत आहे.

आणि ज्याअर्थी, दोषारोपपत्राच्या पुष्ट्यर्थ मा. राज्यपाल यांच्यावतीने प्रकरण सादर करण्यासाठी सादरकर्ता अधिकारी नियुक्त करणे आवश्यक आहे, असे मा. राज्यपालांना वाटते,

त्याअर्थी आता, मा. राज्यपाल, उक्त नियमांच्या नियम ८, पोटनियम (५) (क) द्वारे प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन तसेच संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन परिपत्रकातील तरतूदींचा वापर करुन मा. राज्यपाल याद्वारे, उपरोक्त विनिर्दिष्ट अधिकाऱ्याविरुध्द तयार करण्यात आलेल्या

दोषारोपांच्या चौकशी प्रकरणी “पोलीस उप-अधीक्षक (मुख्यालय), पोलीस अधीक्षक पुणे ग्रामीण यांचे कार्यालय, पुणे” यांना “सादरकर्ता अधिकारी” म्हणून नियुक्त करीत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६०६१६४२०२१३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2024.06.10 12:53:54 +05'30'

**(चेतन निकम)**
उप सचिव, गृह विभाग.

**प्रति,**

१. प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, पुणे विभाग, पुणे.
२. पोलीस उप-अधीक्षक (मुख्यालय), पोलीस अधीक्षक पुणे ग्रामीण यांचे कार्यालय, पुणे.
३. पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण, पुणे.
४. डॉ. सचिन दिलीप बारी, तत्कालीन उप-विभागीय पोलीस अधिकारी, दौंड उप-विभाग, पुणे ग्रामीण. [पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत]

**प्रत :**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अवर सचिव (पोल-१अ), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. निवडनस्ती (कार्यासन, पोल-२)